**वनव्यवस्थापनेच्या दृष्टीने वन विभागाकडील वनक्षेत्र वन विकास महामंडळास हस्तांतरीत करण्यात येऊन त्यांचेकडील वनक्षेत्र वन विभागाच्या ताब्यात घेण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग,

**शासन निर्णय क्रमांक: एफडीसी-२०१५/प्र.क्र.२०२/फ-५**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- १ सप्टेंबर, २०१५.

**संदर्भ:-** प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१४/काआपू/ ६१४/ १५-१६ नागपूर दि.१३/०८/२०१५

**प्रस्तावना:-**

चंद्रपूर शहारालग असून त्यामध्ये फार मोठया प्रमाणावर क्षेत्र रोपवन व झाडोऱ्याविना मोकळे आहे. या क्षेत्रावर W.C.L. CSR मार्फत फळझाडे, रोपवन, नक्षत्र रोपवन, ओपन जिम व नेचरल ट्रेलचे बांधकाम करण्याचे प्रस्तावित आहे. त्याकरिता महाराष्ट्र वन विकास महामंडळाचे ताब्यात असलेले वनखंड क्रंमाक ४८४ चे ३२५.३६ हेक्टर राखीव वनक्षेत्र वन विभागाकडे हस्तांतरीत करण्याची बाब तसेच त्या बदल्यात वन विभागाच्या ताब्यातील वनखंड क्रंमाक ४०९ चे एकुण क्षेत्र ३१५.६५० हे. क्षेत्र असून त्यापैकी वनसंशोधन विभागाच्या ताब्यात २३.३०० हे. क्षेत्र वगळता उर्वरीत २९२.३५ हे. हेक्टर वनक्षेत्र वन विकास महामंडळास हस्तांतरीत करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वन विकास महामंडळाचे ताब्यात असलेले खालील वनखंडाचे वनक्षेत्र, वन व्यवस्थापनेकरिता या शासन निर्णयान्वये वन विभागाकडे हस्तांतरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करीत आहे.

| अ. क्र. | वनखंड क्रमांक | वन विभागाचे ताब्यात घेण्यास उपलब्ध क्षेत्र (हेक्टर) | वनाचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | ४८४ | ३२५.३६ | राखीव वन |
| **एकुण क्षेत्र** | | **३२५.३६** | |

उपरोक्त वनक्षेत्राऐवजी वन विभागाचे ताब्यात असलेले खालील प्रमाणे वनखंड क्रंमाक ४०९ चे एकूण क्षेत्र ३१५.६५० हे. क्षेत्र असून त्यापैकी वनसंशोधन विभागाच्या ताब्यात २३.३०० हे. क्षेत्र वगळता उर्वरीत २९२.३५ हे. हेक्टर वनक्षेत्र वन विकास महामंडळाकडे हस्तांतरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करीत आहे.

| अ. क्र. | वनखंड क्रमांक | एकूण क्षेत्र (हेक्टर) | वनसंशोधन विभागाचे ताब्यातील क्षेत्र (हेक्टर) | वन विकास महामंडळास हस्तांतरीत करण्यास उपलब्ध क्षेत्र (हेक्टर) | वनाचा प्रकार |
|---|---|---|---|---|---|
| १ | ४०९ | ३१५.६५ | २३.३०० | २९२.३५ | राखीव वन |
| **एकुण क्षेत्र** | | **३१५.६५** | **२३.३००** | **२९२.३५** | |

सदरहू शासन निर्णयाची अंमलबजावणी तात्काळ करुन वन विभागाने व महाराष्ट्र वनविकास महामंडळाने आप-आपले वनखंड निहाय क्षेत्र ताब्यात घेण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०१५०९०११७२५५१२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DHAS ANIL N

Digitally signed by DHAS ANIL N
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917247, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DHAS ANIL N
Date: 2015.09.01 17:28:40 +05'30'

**(अनिल धस)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव ), महाराष्ट्र राज्य नागपूर.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित नागपूर.
४. महाव्यवस्थापक (सर्व)/प्रादेशिक व्यवस्थापक (सर्व)
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) / वनसंरक्षक (सर्व)
६. उपवनसंरक्षक (प्रादेशिक) (सर्व)
७. महालेखापाल १/२ महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर.
८. फ-३ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. फ-५ कार्यासन निवड नस्ती.